**शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाच्या घटकांकरीता मार्जिन मनी उपलब्ध करुन देणे या योजनेंतर्गत सन २०२१-२२या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: संकीर्ण-२०२१/प्र.क्र.११४/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३१ जानेवारी, २०२२.

**ज्ञापन :**

आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, केंद्र शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाच्या घटकांकरीता मार्जिन मनी उपलब्ध करुन देण्यासाठी (लेखाशीर्ष २२२५ एफ ३१६) सन २०२१-२२ या वर्षातील अर्थसंकल्पित निधीपैकी अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेला ५०% निधी खर्च करण्यासाठी याद्वारे मान्यता देण्यात येत आहे, याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये हजारात)**

| अ. क्र. | केंद्र शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाच्या घटकांकरीता मार्जिन मनी उपलब्ध करुन देणे | अर्थसंकल्पित निधी रुपये | खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३३, अर्थसहाय्य<br>२२२५ एफ ३१६ | ७,५०,०००<br>(अक्षरी रुपये पंचाहत्तर कोटी फक्त) | ३,७५,०००<br>(अक्षरी रुपये सदतीस कोटी पन्नास लक्ष फक्त) |

२. सदर निधी थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावा.

३. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

५. शासन परिपत्रक, शासन निर्णय, वित्त विभाग, अनुक्रमे दिनांक ६ एप्रिल, २०२१, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक २९ जुलै, २०२१ आणि दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२१-२२ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण
०१, अनुसूचित जातींचे कल्याण
७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना
(०६) स्टँड अप इंडिया योजना
(०६)(०१) अनुसूचित जाती व नवबौध्द नवउद्योजकांना अर्थसहाय्य देणे (अ.जा.उ.यो.)
३३, अर्थसहाय्य
२२२५ एफ ३१६

७. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, शासन निर्णय, वित्त विभाग, अनुक्रमे दिनांक ६ एप्रिल, २०२१, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक २९ जुलै, २०२१ आणि दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ मधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

८. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/ प्र.क्र. ४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०२०११०३४४३९२२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, pseudonym=4AD2EFB239F4E872E96102C1F3E1F196C4C98B39, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2022.02.01 10:36:10 +05'30'

**(प्रविण शिशुपाल)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

आयुक्त,समाजकल्याण,पुणे

**प्रत,**

१. १.मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. २.मा. राज्य मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,

५. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
७. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग,
९. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण,
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
११. कोषागार अधिकारी, पुणे,
१२. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३/७, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
१३. सहसचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. निवड नस्ती /अजाक.